उप संचालक,आरोग्य सेवा सर्व प्रभारी मंडळे यांच्या प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे २२१००४१३ या लेखाशिर्षाखाली मजुरी, कंत्राटी सेवा, भाडेपट्टी कर, आहार खर्च यासाठी पुरवणी मागणी अन्वये प्राप्त झालेल्या निधी खर्चास मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाप्र २०१६/प्रक्र-३८७/ आरोग्य ३(अ)**

गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला, ए विंग
मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई- ४०० ००१.
दिनांक: १८ मार्च, २०१७.

**वाचा:-** शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक- अर्थसं-२०१७/प्रक्र-८९/अर्थ-३ दिनांक ८ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

उप संचालक,आरोग्य सेवा सर्व प्रभारी मंडळे यांच्या प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे २२१००४१३ या लेखाशिर्षाखाली मजुरी, कंत्राटी सेवा, भाडेपट्टी कर, आहार खर्च यासाठी सन २०१६ च्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेले अतिरिक्त अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षाकरिता उप संचालक,आरोग्य सेवा सर्व प्रभारी मंडळे यांच्या प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे २२१००४१३ या लेखाशिर्षाखाली मजुरी, कंत्राटी सेवा, भाडेपट्टी कर, आहार खर्च यासाठी रु.९ कोटी ८७ लक्ष ९७ हजार इतक्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास मंजुरी प्राप्त झालेली आहे. २२१००४१३ या लेखाशिर्षाखालील मजुरी, कंत्राटी सेवा, भाडेपट्टी कर आहार खर्च या उद्दिष्टासाठी मूळ अर्थसंकल्पीय तरतूद,पुरवणी मागणीन्वये प्राप्त निधी, एकूण अर्थसंकल्पित निधी व वितरीत करावयाच्या निधीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे :-

(आकडे हजारात)

| उद्दिष्टाचे नाव | मूळ तरतूद रु. | पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध निधी रु. | एकूण अर्थसंकल्पित निधी रु. | वितरीत करावयाचा निधी रु.(टक्के) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ०२- मजुरी | २१२६ | ७९६६ | १००९२ | १००९२ (१००%) |
| १०-कंत्राटी सेवा | ९२४७९ | ५९६६५ | १५२१४४ | १३६९२९.६०० (९०%) |
| १४-भाडेपट्टी व कर | ७०१० | ९८९१ | १६९०१ | १५२१०.९०० (९०%) |
| १९-आहार खर्च | १२५०० | २१२७५ | ३३७७५ | ३०३९८ (९०%) |

शासन परिपत्रक,वित्त विभाग क्रमांक, अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.८ फेब्रुवारी, २०१७ अन्वये योजनेतर अर्थसंकल्पीय निधी खर्च करण्याची मर्यादा ९० टक्के इतकी असून, मजुरीसाठी निधी खर्च करण्याची मर्यादा १०० % इतकी आहे. तसेच योजनेतर खर्चाची मर्यादा ९० % इतकी आहे. सदर तरतुदीस अनुसरुन मजुरी,

कंत्राटी सेवा, भाडेपट्टी कर, आहार खर्च या उद्दिष्टांसमोर रकाना ५ मध्ये दर्शविलेला निधी वितरीत करण्यास या शासननिर्णयान्वये मंजुरी देण्यात येत आहे. सदर मंजूर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थसंकल्प व प्रशासन), पुणे यांच्याकडे खालील लेखाशीर्षामध्ये वितरीत करण्यात येईल.

मागणी क्र.आर-१,
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा,
११० रुग्णालये व दवाखाने,
(०१)(०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा सुधारणे,
(२२१० ०४१३)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१८४०१३३२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vithoba Kadam

Digitally signed by Arun Vithoba Kadam
DN: cn=Arun Vithoba Kadam, o=Mantralay, ou=PHD, email=arun.kadam@nic.in, c=US
Date: 2017.03.18 16:12:39 +05'30'

**(अ.वि.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) मुंबई/ नागपूर.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई.
४. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, रा. आ. अ., आरोग्य भवन, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. सहसंचालक ( अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. उप संचालक,आरोग्य सेवा मंडळ, ठाणे/पुणे/मुंबई/कोल्हापूर/नाशिक/अकोला/ नागपूर/औरंगाबाद
८. वित्त विभाग ( व्यय -१३ / अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई
९. नियोजन विभाग( का- १४१२) मंत्रालय, मुंबई
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प/ लेखा), मंत्रालय, मुंबई.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे/कोल्हापूर/नाशिक/अकोला/ नागपूर/औरंगाबाद
१२. निवडनस्ती, आ-३ अ